शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळास सन २००९-२०१० या आर्थिक वर्षातील तरतुदीतून व्यवस्थापकीय <u>अनुदानाचा **तिसरा हप्ता** मंजूर करण्याबाबत.</u>

**महाराष्ट्र शासन**

आदिवासी विकास विभाग

शासन निर्णय क.आविम-२००९/प्र.क्र.२८/का-३

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : २६ मार्च, २०१०.

**वाचा** :-(१) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्रमांक- बीयुडी-२००९/ प्र.क्र.८/ का.७, दि. २८ एप्रिल, २००९.

(२) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्रमांक- बीयुडी-२००९/ प्र.क्र.८/ का.७, दि. ३० जून, २००९.

(३) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्रमांक- आविम-२००९/ प्र.क्र.२८/ का ३, दि. ४ नोव्हेबंर, २००९.

(४) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्रमांक- आविम-२००९/ प्र.क्र.२८/ का ३, दि. १० मार्च, २०१०.

(५) व्यवस्थापकीय संचालक, शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ, नाशिक यांचा प्रस्ताव क्रमांक - शविम /लेखा/८५०/२०१०, दि.२०/०३/२०१०.

**प्रस्तावना** :- सन २००९-२०१० या वित्तीय वर्षात शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळास व्यवस्थापकीय अनुदान देण्यासाठी मंजुर करण्यात आलेल्या एकूण रु.३००.०० लाख इतक्या अर्थसंकल्पीय तरतुदीतुन पहिल्या हप्त्यापोटी रु.९५.०० लाख व दुय-या हप्त्यापोटी रु.१५०.०० लाख निधी संदर्भीय दिनांक ४ नोव्हेबंर, २००९ व दिनांक १० मार्च, २०१० च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे. आता महामंडळाने तिस-या हप्त्यापोटी निधी वितरीत करण्याबाबत अनुक्रमांक-५ दिनांक २०/३/२०१० च्या प्रस्तावान्वये विनंती केली आहे. महामंडळाच्या व्यवस्थापकीय अनुदानासाठी सन २००९-२०१० करीता उपलब्ध असलेल्या निधीतून रु.५५.०० लाख एवढा निधी तिस-या हप्त्यापोटी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :- सन २००९-२०१० या वित्तीय वर्षात शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळास व्यवस्थापकीय अनुदान देण्यासाठी अ. क्र. १ दिनांक २८ एप्रिल, २००९ अन्वये रु. १००.०० लक्ष व अ.क्र.२ दिनांक ३० जून, २००९ अन्वये रु. २००.०० लक्ष असा एकूण रु.३००.०० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पित केला असून तो आयुक्त, आदिवासी विकास, नासिक यांच्या अधिनस्त ठेवण्यात आला आहे. सदर अर्थसंकल्पीय तरतुदीतून कॅश फ्लोप्रमाणे माहे एप्रिल, २००९ ते सप्टेबंर, २००९ या

कालावधीसाठी पहिल्या हप्त्यापोटी रु.९५.०० लाख एवढी रक्कम खर्च करण्यास दि. ४ नोव्हेंबर, २००९ च्या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात आली आहे. तसेच दुस-या हप्त्यापोटी रू. १५०.०० लाख दि. १० मार्च, २०१० च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे. आता महामंडळाने अनुक्रमांक-५ दिनांक २०/३/२०१० च्या प्रस्तावान्वये केलेल्या विनंतीनूसार महामंडळाच्या व्यवस्थापकीय अनुदानासाठी सन २००९-२०१० करीता उपलब्ध असलेल्या निधीतून **तिस-या हप्त्यापोटी रु. ५५.०० लाख (रू. पंचावन्न लाख फक्त) एवढा निधी** संगणक वितरण प्रणालीव्दारे वितरीत करुन खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

२. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक यांनी उपरोक्त रक्कम **रु. ५५.०० लाख (रू. पंचावन्न लाख फक्त)** एवढी रक्कम कोषागारातून काढून ती शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ मर्या., नाशिक यांना अदा करावी. महामंडळाने केलेल्या खर्चाचा अहवाल आयुक्तालयामार्फत शासनास सादर करावा.

३. सदर खर्च " मागणी क्रमांक: टी - ५, मुख्य लेखाशिर्ष-२४२५ - सहकार- पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-७९६- जनजाती क्षेत्र उपयोजना-(०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना (१)(१०) शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळास वित्तीय सहाय्य (२४२५ १३५९) ३३ अर्थसहाय्य" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून तो सन २००९-२०१० मध्ये केलेल्या अर्थसंकल्पीय तरतुदीतून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा **संगणक सांकेतांक क्रमांक २०१००३२६१६५४०८००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( सो. ना. बागुल )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
व्यवस्थापकीय संचालक, शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ मर्या. नाशिक.
महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र.१/२, मुंबई/नागपूर.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.
वित्त विभाग,(अर्थोपाय) मंत्रालय, मुंबई .३२.
संचालक, लेखापरिक्षा, ऑफिस ऑफ दि डायरेक्टर, ऑडिट सायंटिफिक अॅन्ड कमर्शियल डिपार्टमेंट, १०१, महर्षि कर्वे रोड, मुंबई-४०० ०२०.
क.अ. (का-६ व ७) , (का.१) आदिवासी विकास विभाग,मंत्रालय, मुंबई-३२.
निवड नस्ती (का.३)आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.